सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय अमरावती व नाशिक या रुग्णालयांकरीता आवश्यक असणारी औषधी व साहित्य खरेदीची प्रलंबित देयके भागविण्याकरीता लेखाशिर्ष २२१० ४२५९ या अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उद्दीष्टाखाली मार्च,२०२५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेल्या निधीतून रु.५.०० कोटी इतकी रक्कम वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक आरोग्य विभाग
**शासन निर्णय क्रमांकः पुरमा-१४२५/प्र.क्र २३/आरोग्य-८**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : २८ मार्च, २०२५

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दिनांक २५.०७.२०२४
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.पूरक-२०२४/प्र.क्र.७९/अर्थ-३, दिनांक २९.०७.२०२४
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग,क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३,दि.१७.०३.२०२५१७.०३.२०२५.
४) सहसंचालक,आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई यांचे पत्र क्र. आसेआ/कक्ष-३/टे-४/२२१० ४२५९/निधी वितरण/२०२५,४५६८-७३, दि.२०.०३.२०२५

**प्रस्तावना:-**

वाचा मधील अ.क्र. ४ येथील दि.२०.०३.२०२५ रोजीच्या पत्रान्वये सहसंचालक, आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर) ,मुंबई यांनी विनंती केल्याप्रमाणे, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय अमरावती व नाशिक या रुग्णालयांकरीता आवश्यक असणारी औषधी व साहित्य खरेदीची प्रलंबित देयके भागविण्याकरीता लेखाशिर्ष २२१० ४२५९ या अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उद्दीष्टाखाली मार्च,२०२५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेली रु.५.०० कोटी इतकी रक्कम वितरीत करण्यास मान्यता देण्याचा प्रस्ताव वित्त विभागास सादर करण्यात आला होता.

वित्त विभागाने मान्यता दिल्यानुसार, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय अमरावती व नाशिक या रुग्णालयांकरीता आवश्यक असणारी औषधी व साहित्य खरेदीची प्रलंबित देयके भागविण्याकरीता लेखाशिर्ष २२१० ४२५९ या अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उद्दीष्टाखाली मार्च,२०२५ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेला रु.५.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त वस्तुस्थिती विचारात घेता, सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय अमरावती व नाशिक या रुग्णालयांकरीता आवश्यक असणारी औषधी व साहित्य खरेदीची प्रलंबित देयके भागविण्याकरीता लेखाशिर्ष २२१० ४२५९ या अंतर्गत २१- पुरवठा व सामुग्री या उद्दीष्टाखाली मार्च,२०२५ च्या

अर्थसंकल्पीय अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर केलेली रु.५.०० कोटी इतकी रक्कम वितरीत खालील तक्त्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे तसेच खालील नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास तसेच विहित कार्यपध्दतीने खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

२. **निधी वितरणाचा तपशील**

| अ.क्र. | लेखाशिर्ष | निधी वितरण (रक्कम रूपयात) | | |
|---|---|---|---|---|
| | | **विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती करिता वितरीत करावयाचा निधी** | **विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक करिता वितरीत करावयाचा निधी** | **एकूण** |
| १. | मागणी क्रमांक आर - **१, २२१०** वैद्यकीयसेवा व सार्वजनिक आरोग्य<br>**(०६) (२१)** महसूल विभागाच्या मुख्यालयांच्या ठिकाणी विभागीय संदर्भीय सेवा केंद्र स्थापन करणे **(२२१० ४२५९)**<br>उद्दिष्ट/बाब क्र. **२१-** पुरवठा व सामग्री | रु. ३,००,००,०००/- | रु. २,००,००,०००/- | **रु. ५,००,००,०००/-** |

३. सदर खरेदीसाठीचे वितरीत करावयाच्या प्रलंबित देयकांची द्विरुक्ती होणार नाही तसेच निधी विहित कार्यपद्धतीने खर्च करण्याची संपूर्ण जबाबदारी सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई, वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक तसेच वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती यांची राहील.

४. सदरचा खर्च लेखाशिर्ष २२१० ४२५९ या अंतर्गत २१-पुरवठा व सामुग्री या उद्दीष्टाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातुन खर्ची टाकण्यात यावा.

५. वित्त विभागाच्या दिनांक २९ जुलै, २०२४ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता करण्याची तसेच सदर खरेदीची व निधी वितरणाची संपूर्ण जबाबदारी सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई, वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक तसेच वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती यांची राहील.

६. यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखा परिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे प्रमाणपत्र सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई, वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक तसेच वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती यांनी सादर केल्यानंतरच सदर निधी वितरीत करण्यात येईल.

७. वित्त विभागाच्या दिनांक २५.०७.२०२४ व दि.२९.०७.२०२४ च्या शासन परिपत्रकातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे / अटी व शर्तीचे पालन करुन त्या संदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे अथवा सदरहून निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास/ सहसंचालक, आरोग्य सेवा (रुग्णालये-राज्यस्तर),मुंबई, वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक तसेच वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती यांना बंधनकारक राहील.

८. महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्र. मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तीच्या अधिन राहून निधी वितरण करण्यात येत आहे.

९. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प ३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

१०. सदर प्रस्तावावरील निधीच्या विनियोगाच्या अनुषंगाने आवश्यक तेथे करावयाच्या खरेदीच्या संदर्भात शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक १ डिसेंबर, २०१६ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकारी यांची प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

११. सदर शासन निर्णय महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका (भाग-१) १९७७ मधील परिच्छेद १४२ मधील तरतुद, वाचा मधील अ.क्र. २ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रक, दिनांक २९.०७.२०२४ मधील तरतुदीनुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार तसेच वित्त विभागाच्या, अनौपचारिक संदर्भ क्र.२९३/२०२५/व्यय-१३, दिनांक २७.०३.२०२५ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२८१९१११२३६१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIKAS TULSHIRAM KADAM

Digitally signed by VIKAS TULSHIRAM KADAM
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=9869ec61c857e78e82b7a19b04c6d22f8ef1b8dbc9b19d45ef776d80ef148059, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=406CB152E109154A7466C0050F88E5A437E17838973824687653A5E8D144B72B, cn=VIKAS TULSHIRAM KADAM
Date: 2025.03.28 05:02:48 +05'30'

**(विकास तु.कदम)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.
४) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा,(रुग्णालये-राज्यस्तर ),मुंबई
६) सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई.
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता),मुंबई /नागपूर.
८) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.
९) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
१०) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी,मुंबई.
१२) वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती
१३) वैद्यकीय अधीक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, नाशिक
१४) निवडनस्ती (आरोग्य-८)